**“जागतिक बँकेच्या सहाय्याने केंद्र शासन पुरस्कृत औद्योगिक मूल्य वृध्दीकरणासाठी कौशल्याचे बळकटीकरण करणे (Skill Strengthening for Industrial Value Enhancement) (STRIVE) या योजनेच्या अंतर्गत राज्य सुकाणू समितीमध्ये मंत्रालयीन संवर्गातील सह सचिव, अवर सचिव यांचा समावेश करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१९/प्र.क्र.१५१/व्यशि-३**

मंत्रालय, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७ जानेवारी, २०२०.

वाचा : **कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्र. जाबॅप्र-२६११/ प्र.क्र.१८/१९/व्यशि-५, दि. २२ ऑगस्ट, २०१९.**

**प्रस्तावना :-**

जागतिक बँकेच्या सहाय्याने केंद्र शासन पुरस्कृत औद्योगिक मूल्य वृध्दीकरणासाठी व कौशल्याचे बळकटीकरण करणे याकरीता Skill Strengthening for Industrial Value Enhancement (STRIVE) या योजनेची राज्यामध्ये अंमलबजावणी उपरोक्त शासन निर्णयान्वये करण्यात येत आहे.

या अंतर्गत शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांकडून विहित नमुन्यातील Institutional Strategic Plan (ISP) मागविण्यात येत आहेत. Institutional Strategic Plan (ISP) मुल्यांकनांच्या आधारे राज्य सुकाणू समितीने शिफारस केलेल्या शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची निवड स्पर्धात्मक तत्वावर राष्ट्रीय सुकाणू समितीमार्फत करण्यात येणार आहे.

याअनुषंगाने संदर्भाधिन शासन निर्णयान्वये राज्यामध्ये STRIVE प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या संनियंत्रणासाठी अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली राज्य सुकाणू समितीची रचना करण्यात आलेली आहे. **(परिशिष्ट अ)** सदर समितीमध्ये संबंधित विषय हाताळणाऱ्या अधिकाऱ्यांचा समावेश व्हावा याकरीता मंत्रालयीन स्तरावरील सह सचिव आणि अवर सचिव दर्जाच्या अधिकारी यांचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सदर शासन निर्णयान्वये STRIVE या योजनेंतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्य सुकाणू समिती मध्ये सह सचिव व अवर सचिव यांच्या समावेश करण्यात मान्यता देण्यात येत आहे. त्याअनुसार राज्य सुकाणू समितीची सुधारित रचना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

**राज्य सुकाणू समितीची सुधारित रचना:-**

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे प्रतिनिधी (किमान उपसचिव दर्जाचे) | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे प्रतिनिधी (किमान अधिक्षक अभियंता दर्जाचे) | सदस्य |
| ४. | सह सचिव/ उप सचिव (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५. | अवर सचिव (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ६. | अग्रणी औद्योगिक संघटनेचे/ लघु-मध्यम उद्योगांच्या संघटनांनी नामनिर्देशित केलेले तिन प्रतिनिधी | सदस्य |
| ७. | व्यवसाय प्रशिक्षण क्षेत्रातील तीन तज्ञ व्यक्ती (ज्यांना व्यवसाय प्रशिक्षणाची आवड व ज्ञान आहे अशा व्यक्ती) | सदस्य |
| ८. | संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००१०७१८१२२४७२०३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.01.07 18:00:50 +05'30'

**(डॉ. सुवर्णा खरात)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. सह सचिव/ उप सचिव (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत).
८. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनायामार्फत).
९. प्राचार्य, सर्व संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत).
१०. सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी (उद्योग-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.